**नायब तहसीलदार, “गट-ब” संवर्गातील ०४ परिविक्षाधीन उमेदवारांकरीता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- इएसटी-२०२२/प्र.क्र.०१/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२२.

<u>संदर्भ</u>:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/०२/२०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.३७/सीपीटीपी-ब, दि.२४/१२/२०२१.
३) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.३७/सीपीटीपी-ब, दि.२९/१२/२०२१.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.इएसटी-२०२२/प्र.क्र.०१/ई-८,दि.१७/०१/२०२२.
५) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र.टिआरएन-१०२१/प्र.क्र.३७/सीपीटीपी-ब, दि.१३/०१/२०२२ व दि.१४/०१/२०२२.

**<u>प्रस्तावना:-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.०२ दि.२४/१२/२०२१ अन्वये राज्यसेवा परीक्षा-२०१९ च्या अंतीम निकालान्वये शिफारसप्राप्त ठरलेल्या गट “ब” संवर्गातील उमेदवारांच्या प्रशिक्षणासाठी मार्गदर्शक सूचना विहीत केलेल्या आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट “ब” संवर्गातील उमेदवारांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येते. त्यानुसार राज्य सेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या परिविक्षाधीन नायब तहसीलदार “गट-ब” संवर्गातील प्रशिक्षणासाठी हजर झालेल्या एकूण ९६ उमेदवारांकरीता उपरोक्त संदर्भ ०४ अन्वये अधिसंख्य पदे दोन वर्षाकरीता निर्माण करण्यात आली आहेत.

आता, सामान्य प्रशासन विभाग,सीपीटीपी-ब,दिनांक १३/०१/२०२२ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये राज्यसेवा परीक्षा-२०१९ च्या शिफारस यादीतील शिंदे अभिजित प्रदिप, लोंढे सुनिल महादेव व अजय संजय पाटील या ०३ उमेदवारांना परिविक्षाधीन नायब तहसिलदार गट “ब” पदी नियुक्ती देण्यात आली.

तसेच, राज्यसेवा परीक्षा-२०१९ च्या शिफारस यादीमध्ये अनाथ आरक्षण प्रवर्गातील रिक्त जागावर पात्र उमेदवार न मिळाल्यामुळे त्यांच्या जागी गुणवत्तेनुसार शिफारसप्राप्त ठरलेल्या आणि अनाथ आरक्षण प्रवर्गातील नियुक्तीच्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई येथे दाखल मुळ अर्ज क्र ३८०/२०२० सह संकिर्ण अर्ज क्र.२१३/२०२० श्रीमती अमृता करवंदे व इतर ०२ विरुध्द महाराष्ट्र शासन प्रकरणामध्ये मा. प्रशासकीय न्यायाधीकरण,मुंबई यांनी दिनांक १५/०९/२०२० रोजी सदर दोन पदावर नियुक्ती देण्यासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यात येऊ नये, असे अंतरीम आदेश दिले होते. सदर आदेश विचारात घेता, त्यांना नियुक्ती देण्यात आली नव्हती. सदर प्रकरणी दिनांक १३/०१/२०२२ रोजीच्या सुनावणीअंती मा. न्यायाधीकरणाने सदर प्रकरणाची स्थगती उठवून मुळ अर्ज क्र.३८०/२०२० सह संकिर्ण अर्ज क्र.२१३/२०२० खारीज केलेला आहे. सदर आदेश विचारात घेता, अमोल महादेव नरुटे, परिविक्षाधीन नायब तहसिलदार गट “ब” संवर्गातील उमेदवारास सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दिनांक १४/०१/२०२२ च्या शासन आदेशान्वये नियुक्ती देण्यात आली आहे.

उपरोक्त संदर्भ क्र.०५ सामान्य प्रशासन विभागाच्या कार्यालयीन आदेशान्वये ०४ परिविक्षाधीन अधिकारी यांचे परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) अंतर्गत प्रशिक्षणासाठी दिनांक १७/०१/२०२२ पासून वनामती, नागपूर या संस्थेमार्फत प्रशिक्षण सुरु झाले आहे. नायब तहसिलदार गट 'ब' संवर्गातील ०४ परिविक्षाधीन उमेदवारांचे वेतन अदा करण्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य सेवा मुख्य परीक्षा-२०१९ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या व सामान्य प्रशासन विभागाने प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्त केलेल्या परिविक्षाधीन नायब तहसिलदारांसाठी " गट-ब " संवर्गातील ०४ अधिसंख्य पदांना दिनांक १७ जानेवारी,२०२२ ते दिनांक १७ जानेवारी,२०२४ या कालावधीकरीता शासन मान्यता देत आहे.

२. सदरहू परिविक्षाधीन नायब तहसीलदार यांच्या दिनांक १७ जानेवारी,२०२२ ते दिनांक १७ जानेवारी,२०२४ या कालावधीतील अधिसंख्य पदाच्या वेतनावरील होणारा खर्च परिविक्षाधीन उमेदवार जिल्हानिहाय प्रशिक्षणासाठी वर्ग केलेल्या जिल्ह्याकरिता "मागणी क्र. सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन (००)(०९३) जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८)/ आयुक्त नाशिक (२०५३ ००४६)/ आयुक्त पुणे (२०५३ ००६४)/ आयुक्त अमरावती (२०५३ ००८२)/ आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८)/ आयुक्त औरंगाबाद (२०५३ ०१२६) या लेखाशिर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि- २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/२/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२१४१६१६३९१२१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2022.02.14 16:18:56 +05'30'

**( अतुल कोदे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त(सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंपाजवळ, अमरावती रोड, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी,(सर्व)
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग ( सीपीटीपी-ब), मंत्रालय, मुंबई - ३२.
११. सह सचिव / उप सचिव (कार्यासन ब-१/ ई-९) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
१२. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.